प्रशासकीय मान्यता : सन २०१९-२० या आर्थिक वर्षात " शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे " या योजनेतंर्गत प्राप्त अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

शासकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज.

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : जीएचएम-२०२०/प्र.क्र.४०/प्रशा-१**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : ३१ जानेवारी, २०२०

**वाचा :**
१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसं/आशिपता/रायो (१६२९)/यंसाख/प्र.मा./३-म/१०३८/२०२०, दिनांक २८ जानेवारी, २०२०.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज संलग्नित आरोग्य शिक्षण पथक, तासगाव या संस्थेस " शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे " योजनेतंर्गत उपलब्ध होणाऱ्या निधीतून खालील तक्त्यात नमूद रुपये ९,९९,०५०/-(रुपये नऊ लक्ष नव्व्याण्णव हजार पन्नास फक्त) इतक्या रक्कमेची यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १ | सेमी ऑटोमेटीक बायोकेमिस्ट्री ॲनेलाइजर | ०१ | १,१५,००० | १,१५,००० |
| २ | डिजीटल थ्री चॅनेल ईसीजी मशीन | ०२ | ३५,८०० | ७,१६,०० |
| ३ | एलायजा रिडर | ०१ | २,९७,००० | २,९७,००० |
| ४ | ट्रायनाक्युलर मायक्रोस्कोप विद मॅगकॅम डिजीटल कॅमेरा | ०१ | १,१६,००० | १,१६,००० |
| ५ | बायनाक्युलर मायक्रोस्कोप | ०२ | ६९,००० | १,३८,००० |

| अ.क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रति नग किंमत | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| ६ | एलईडी बीपी ॲपरेटस | ०५ | ४,००० | २०,००० |
| ७ | एक्झामिनेशन कोच | ०३ | ३०,००० | ९०,००० |
| ८ | स्टेथेस्कोप | ०६ | ७,००० | ४२,००० |
| ९ | ओटोस्कोप | ०१ | ९,४५० | ९,४५० |
| १० | स्लीट लॅम्प | ०१ | ९,८०० | ९,८०० |
| ११ | डायरेक्ट ऑफ्थाल्मोस्कोप | ०१ | १५,२०० | १५,२०० |
| १२ | डिजीटल कॅमेरा | ०१ | ५०,००० | ५०,००० |
| १३ | टुथ एक्स्ट्रॅक्शन फोरसेप्स सेट | ०१ | २५,००० | २५,००० |
| | | | एकूण | ९,९९,०५० |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता संबंधित संस्थेस " शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे " योजनेतंर्गत उपलब्ध निधीतून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री हाताळणीसाठी नव्याने पदनिर्मितीची आवश्यकता तसेच बांधकाम / विद्युतीकरणाची नाही, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा केली आहे.

३. सदर विषयी " शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका " याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

४. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया " औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत " निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

५. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक ( वै.शि. ) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

७. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

८. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

९. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ " किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा " या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे खरेदी समितीने अनुपालन करावे. त्यानुषंगाने यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्त्यात नमूद केलेल्या यंत्रसामुग्री खरेदीसाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्र.एस-४

| | |
|---|---|
| ४२१० | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्ययावरील भांडवली खर्च |
| ०३ | वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५ | विषमचिकित्सा |
| (००) (३७) | शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व रुग्णालये यांचे बळकटीकरण व दर्जावाढ करणे (कार्यक्रम) (४२१० १६२९) |
| ५२ | यंत्रसामग्री व साधनसामग्री |

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३११३१९०७७६१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.31 14:45:33 +05'30'

( अ. मु. डहाळे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - १ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई.

२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
४. अधिष्ठाता, शासकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
६. निवडनस्ती (प्रशा-१).